# मी आहे - हेलेन केलर

ब्रैड मेत्ज़र, चित्र : क्रिस्टोफर मराठी: अनुजा सामंत



जेव्हा मी लहान होते, मी अगदी तुमच्यासारखी होते.
मला खेळायला आवडायचे.
माझा कुत्रा मला खूप आवडायचा. आकर्षक रंगीबेरंगी फुले पहायला मला आवडत. लोकांची नक्कल करायलाही आवडायचे.
सहा महिन्यांतच मी हे बोलायला लागले होते.



माझ्या पहिल्या वाढदिवसाच्या दिवशी मी चालायला लागले.
एक शब्द मला खूप आवडायचा – वाह वाह




इतर सर्व मुलांसारखे, बरोबर ना?
पण एका गोष्टीने मला इतरांपेक्षा वेगळे बनवले.
जेव्हा मी एकोणीस महिन्यांची होते, तेव्हा खूप आजारी पडले.
मी वाचणार नाही असे डॉक्टरांनी सांगितले.
मी वाचले, पण आजाराने मला अंध आणि बहिरे बनवले.

आता मला जग असे दिसत होते.

तुमचे डोळे बंद करा.
तुमचे कान हात ठेवून बंद करा.
मला काहीच दिसत नव्हते.
की काही ऐकू येत नव्हते.

बरोबर.

काहीच नाही.

मला माहित आहे, तुम्ही घाबरला असाल.
मलासुद्धा खूप भीती वाटायची.
त्यावेळी लोकांना अंध आणि बहिऱ्या मुलांबद्दल विशेष माहिती नव्हती.
नातेवाईकांना तर मी राक्षस वाटायचे.




त्यांचे म्हणणे बरोबर होते: माझी वर्तणूक योग्य नव्हती. मी खूप निराश झालेले होते.
माझ्या काळोखी जगात, माझी काळजी कोणी घेतय का? कोणाच माझ्याकडे लक्ष आहे का? मी सांगू शकत नव्हते.
मी जे काही करतेय ते मी पाहु शकत नव्हते की ऐकू शकत नव्हते,

पाच वर्षाची होईस्तोवर, मी लोकांशी बोलायचे काही मार्ग शोधून काढले.
“हो” म्हणण्यासाठी मी डोक वरखाली करायचे.
“नाही” सांगण्यासाठी डोक डावीउजवीकडे करायचे,

“बाबा” म्हणण्यासाठी त्यांची चष्मा लावण्याची नक्कल करायचे.



“आई” म्हणण्यासाठी मी माझ्या हातावर गाल ठेवायचे.



माझ्या लहान बहिणीसाठी, मी असं करायचे.



आणि जेव्हा थंडीने थरथरयेत, तेव्हा त्याचा खरा अर्थ होता...



पण एवढे असूनही मी माझ्या कुत्र्याला – बेलेला खेळू शकत नव्हते.
बोलता येत नव्हते, त्यामुळे मी त्याला बोलावू शकत नव्हते.
मला माझ्या कुत्र्यासोबत फक्त खेळायचे होते.




दुःख हे होते की मला माझ्या काळोखी आणि आवाजहीन दुनियेची सवय झाली होती.

मला सोडून द्या असा सल्ला लोकांनी माझ्या आईबाबांना दिला. कारण मी काहीच चांगले करु शकत नव्हते.
तरी त्यांनी ऐकले नाही.
दुसऱ्या अंध आणि बहिऱ्या मुलीबद्दल वाचून, त्यांना असे काहीतरी मिळाले जे माझ्या आजारपणानंतर त्यांनी गमावले होते.
***आशा.***




आपल्याला माहिती आहे, प्रत्येकाला शिक्षकाची गरज असते.
पण माझ्यासमोर काय येईल ह्याची मला कल्पना नव्हती.

त्या दिवसापेक्षा अधिक महत्त्वपूर्ण दिवस असू शकत नाही.
मी फक्त सहा वर्षांची होते.
माझ्या आईच्या चाललेल्या घाईमुळे काहीतरी मोठे घडणार आहे मला माहित होते.
बाल्कनीमध्ये उभी राहून मी, वाट बघत होत, चेहऱ्यावर सूर्यप्रकाश अनुभवत होते.



कोणातरी आले- मला येणारी पावले जाणवली.

माझी आई आहे असे समजून मी जवळ गेले.

तिने खेचून मला मिठीत घेतले.




त्यांचे नांव होते एनी सुलिवन.
हीच ती शिक्षिका, जिने माझे
आयुष्य बदलून टाकले.

शिकवायला सुरुवात करतानाच, त्यांनी मला खेळण्यातली बाहुली दिली.
थोडा वेळ तिच्याशी खेळल्यावर, त्यांनी माझ्या पंज्यावर बोटांनी बाहुली अशी अक्षरे लिहिली.




मला ती जाणवत होती.

पण अक्षरे किंवा शब्द काय ते मला माहित नव्हते . ते कशासाठी असतात ते मला कळत नव्हते

पण मिस सुलिवन शांत राहिल्या नाहीत.
एके दिवशी, त्या मला ’मग’ आणि ’पाणी’ हे शब्द शिकवण्यासाठी झगडत होत्या.
मला इतका राग आला होता की मी माझी नवी बाहुली जमिनीवर फेकली.
तेव्हा मला खूप राग यायचा.



माझ्यासाठी सारे खूप कठीण होते.
मी निराश झालेले होते.

स्वतःचा तोल जराही न गमावता, ती मला बाहेर घेऊन गेली. जवळच्याच एका नळाजवळ, तिने माझा हात वाहत्या पाण्याखाली धरला.
आणि माझ्या दुसऱ्या हातावर तिने अक्षरे लिहिली – पा णी



तिने पुन्हा अक्षरे लिहिली.

W-A-T-E-R.

पुन्हा लिहिले.

W-A-T-E-R.

परत लिहिले

W-A-T-E-R.

आणि पुन्हा

W-A-T-E-R.

पुन्हा एकदा लिहिले

W-A-T-E-R.

W-A-T-E-R.

W-A-T-E-R.

W-A-T-E-R.

W-A-T-E-R.

तुला कळले.
हो ना?
तुला कळले!!

हो! मला समजले.

त्या दिवशी मला समजले की प्रत्येक गोष्टीला एक नाव असते.
त्यानंतर मी ज्या वस्तूला हात लावेन ती जीवंत होत होती.




आता मी माझ्या बाईंच्या हातावर शब्द लिहीले.
माझ्याकडे असे कोणीतरी होते, जे मला समजून घेऊ शकत होते.

जेव्हा तुम्ही नवीन काही शिकायला सुरुवात करता, तेव्हा बरेचदा ते कठीण असते.
मी शब्दांपासून सुरुवात केली.
हळुहळु माझा शब्दसंग्रह वाढू लागला.
अखेरीस, मी प्रेम ह्या शब्दाचा अर्थ शिकले.
मी माझ्या बाईंना काही फुले दिली. मग त्यांनी माझ्या हातावर लिहिले...




“ते इथे असते.” माझ्या हृदयाजवळ
थोपटत त्यांनी लिहिले.
तरीही मी गोंधळलेलेच होते.
ज्याला मी स्पर्श करु शकत नाही
ते समजून घेणे
माझ्यासाठी कठीण होते.



मला काही समजत नव्हते.
बाई मला प्रेम दाखवू का शकत नाहीत?
पण नंतर त्यांनी समजावले...



त्याक्षणी माझे सगळे जग बदलून गेले.
जणू काही मी आणि माझ्या नातलगांमध्ये अदृश्य रेषा तयार झाल्या.
तुम्ही डोळे बंद करा.
तुम्हालाही जाणवेल – तुमचे कुटुंब आणि मित्रांमधील बंध



तरीही, आयुष्य माझ्यासाठी सोपे नव्हते.
अंध असल्याने मला लोकांचे चेहरे दिसत नव्हते.
बहिरेपणामुळे मला त्यांचे आवाज ऐकू येत नव्हते.
मला माझे यश तेव्हा मिळाले जेव्हा मी ते शिकले जे तुम्ही आता करत आहात – वाचन



सरावासाठी मी वस्तू आणि शब्दांच्या जोड्या लावत असे आणि वाक्य बनवी.
आता हा माझा आवडता खेळ होता.
हा खेळ आम्ही तासन्तास खेळत असू.
तुम्ही वाक्य सापडते का बघा : मुलगी कपाटात आहे.



त्यानंतर मी खरी पुस्तके वाचायला सुरुवात केली.
अगदी तुमच्यासारखी.
फक्त एक फरक होता. माझी पुस्तके ब्रेल लिपीमध्ये होती. लाल ठिपक्यांनी बनलेली अक्षरे, जी तुम्ही बोटांनी वाचू शकता.



सुरुवातीला थोडे त्रासदायक होते.

पण नंतर सवय झाली.

**हे ठिपक्यांनी लिहिलेले माझे नाव हे-ले-न.**

ही आहेत ब्रेलमध्ये लिहिलेली सारी अक्षरे

A B C D E F
G H I J K L
M N O P Q R
S T U V W X
Y Z



वाचनाचा अनुभव अजून गमतीदार होण्यासाठी माझ्या बाई मला बाहेर घेऊन जायच्या. त्यांना माहित होते की मला चेहऱ्यावर आलेले ऊन आणि पाईनचा सुगंध खूप आवडतो. मी माझी पुस्तके इतक्या वेळेस वाचली की पुस्तकातले ठिपके घासले गेले.

माझ्या पुस्तकांमध्ये होते अरेबियन नाईट्स, रोबिनसन क्रुसो आणि माझे सर्वात आवडते लिटिल वुमन.

त्या पानांमध्ये मला शूर मुलेमुली भेटत-
ज्यांना दिसत होते, ऐकू येत होते.






मी नऊ वर्षांची असताना, मला बोलायचे कसे ते शिकायचे होते.
मिस सुलिवनलाही मला शिकवायचे कसे ह्याची चिंता होती. त्यांना वाटले मी निराश होईन.
पण आता थांबवणे मला कोणालाच शक्य नव्हते.
माझ्या मदतीसाठी, मिस सुलिवन मला साराह फुलर नावाच्या शिक्षिकेकडे घेऊन गेल्या. त्या माझा हात त्यांच्या तोंडावर ठेवत होत्या आणि त्यांचे आवाज समजण्यासाठी त्यांची जीभ आणि ओठ अनुभवायला देत होत्या.




**एका तासात मी ही अक्षरे शिकले –**

**M, P, A, S, T आणि I.**



आता मी माझ्या कुत्र्याला बोलावू शकत होते, आणि मी बोलावल्यावर तो येत होता.
माझ्या सातव्या धड्यामध्ये, मी हे वाक्य बोलायला शिकले,
जे वाक्य मी पुन्हा पुन्हा उच्चारत होते:



जसजशी मी मोठी होत होते, तसे मी फक्त इंग्रजी शिकले नाही,
तर फ्रेंच आणि जर्मनही शिकले.
मला उच्च शिक्षणासाठी, हार्वर्ड युनिव्हरसिटीच्या रेडक्लिफ कॉलेजमध्ये जायचे होते.




हार्वर्डमध्ये बरीचशी पुस्तके ब्रेलमध्ये उपलब्ध नव्हती.
मिस सुलिवन बरीचशी पुस्तके माझ्या हातावर लिहीत.
अशातऱ्हेने मला शिकायला आवडू लागले.
निस्वार्थी आणि चिकाटी असणारी अशी होती मिस सुलीवन.

कॉलेजडिग्री मिळवणारी अंधबधिर मी पहिली होते.
आणि शेवटची नव्हते.
मोठी झाल्यावर मी बारा पुस्तके लिहिली आणि चौतीस देशांमध्ये फिरले
पण सर्वात महत्त्वपूर्ण गोष्ट मी केली की अन्य विकलांग विद्यार्थ्यांना
शिकण्याची संधी उपलब्ध होईल.



ही तर फक्त सुरुवात होती.

मी फक्त अंध आणि बहिऱ्यांना मदत केली नाही.

मी सामाजिक बदल होण्यासाठी लढायला सुरुवात केली: महिलांचे मतदान, गरिबांना जगण्यासाठी मदत आणि ज्या कोणाला मदत हवी त्या साऱ्यांना मदत केली.




**आज अमेरिकन फाउंडेशन फॉर द ब्लाइंड  आणि हेलेन केलर इंटरनॅशनल जगभरात अंध आणि उपाशी लोकांची मदत करते.**

माझ्या आयुष्यात, ते म्हणायचे की मी वेगळी आहे.
ते म्हणायचे मी कधी सामान्य असू शकत नाही.
पण सत्य काही वेगळे होते. “सामान्य” आयुष्य असे काही नसते.
आपण सारेजण म्हणजे फुलं आहोत, ज्याला पाण्याची आवश्यकता असते.
प्रत्येक व्यक्तिमध्ये अनेक शक्यता असतात.
आणि प्रत्येक व्यक्तिमध्ये संकटांवर मात करण्याची ताकद असते.



जरा माझ्याकडे बघा.
माझे शब्द ऐका.
मी पाहू शकत नसले तरी माझ्याकडे दृष्टी आहे.
मी ऐकू शकत नसले तरी मला आवाज आहे.






स्वतःचे आयुष्य म्हणजे एक शिखर आहे जे सर करायचे आहे.
शिखरावर जायचा योग्य असा मार्ग नाही.
वाकडे-तिकडे आपले स्वतःचे रस्ते असतात.




**मध्येच कधीतरी तुम्ही घसराल, खाली पडाल.**
**पुन्हा पुन्हा पडाल.**
**पण जर तुम्ही उभे रहाल आणि चढायला सुरुवात कराल, मी वचन देते...**

एक दिवस तुम्ही शिखरावर नक्की पोहोचाल.

तुम्हाला मागे खेचणारं कोणी नाही
आपल आयुष्य तसे असते जसे आपण बनवू
संकटे नेहमीच येत राहतील
पण त्यांच्यासोबत नेहमी मार्गही असतात



मी आहे हेलन केलर
पुढे जाण्यापासून मला कोणी अडवू शकत नाही.



हा, एक शेवटची गोष्ट

त्या शिक्षकांना नक्की धन्यवाद द्या ज्यांनी तुम्हाला नितांत गरज असताना मदत केली





***जगातील सर्वोत्कृष्ट आणि सर्वात सुंदर गोष्ट पाहून किंवा स्पर्श करुन तुम्ही अनुभवू शकत नाही, ती केवळ हृदयाने अनुभवायची असते. – हेलेन केलर***

घटनाक्रम Timeline

| जून 27, 1880 | फेब्रुवारी, 1882 | मार्च 3, 1887 | एप्रिल 5, 1887 | 1889 |
|---|---|---|---|---|
| JUNE 27, 1880 | FEBRUARY 1882 | MARCH 3, 1887 | APRIL 5, 1887 | 1889 |
| टूसकुम्बिया, अल्बामा, अमरीका मध्ये जन्म | आजारानंतर बघण्याची आणि ऐकण्याची क्षमता हरवली | ऐनी सुलिवन, हेलेन केलरची शिक्षिका बनली | हेलेन पहिला शब्द पाणी (WATER) लिहिला | मेसाचुसेट्समध्ये पर्किन्स इंस्टिट्यूट फॉर द ब्लाइंड मध्ये शिकायला गेली |



**हेलेन वय 8 वर्ष, ऐनी सुलिवन सोबत**



**हेलेन तिच्या कुत्र्यासोबत**



**हेलेन, एलेअनोर रूज़वेल्ट च्या ओठांवरुन हात फिरवून "ऐकताना"**

| | |
|---|---|
| 1890 | साराह फुलरने हेलेनला बोलायला शिकवले |
| 1903 | पहिले आत्मचरित्र छापले गेले "द स्टोरी ऑफ माय लाईफ" |
| 1904 | हार्वर्ड यूनिवर्सिटीची स्नातक |
| 1924 | अंधांसाठी अमेरिकन फाउंडेशन सोबत काम |
| ऑक्टोबर 20, 1936<br>OCTOBER 20, 1936 | ऐनी सुलिवनचा मृत्यु |
| सप्टेंबर 1964<br>SEPTEMBER 1964 | प्रेसिडेंट मैडल फॉर फ्रीडम पुरुस्कार |
| जून 1, 1968<br>JUNE 1, 1968 | कनेक्टिकट मध्ये मृत्यु |

# मी आहे – हेलेन केलर



मला कोणी थांबवू शकत नाही.